जलस्वराज्य-२ कार्यक्रम.
वर्ष २०२१-२२ करिता जलस्वराज्य-२ कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांच्या नावे असलेल्या स्वीय प्रपंजी खात्यामध्ये निधी वर्ग करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः बजेट-१२२१/प्र.क्र.५७/पापु-११
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०४.०२.२०२२

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१३/प्र.क्र.२००/पापु-११, दि.०४.०१.२०१४
२) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१४/प्र.क्र.२५६/पापु-११, दि.०३.०३.२०१६
३) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१०२०/प्र.क्र.७८/पापु-११, दि.०१.०२.२०२२

प्रस्तावना :-

सन २०१४ ते २०२० या कालावधीकरिता राज्यामध्ये लोक सहभागातून आणि मागणी आधारित तत्वावर जलस्वराज्य-२ कार्यक्रम राबविण्याबाबतचा निर्णय दिनांक ०४/०१/२०१४ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. जागतिक बँकेने जलस्वराज्य-२ कार्यक्रमास दिलेली मुदत दिनांक ३०.०९.२०२० रोजी संपुष्टात आलेली आहे. जलस्वराज्य-२ कार्यक्रमामध्ये हाती घेण्यात आलेले प्रकल्प राज्य हिश्श्यातून पूर्ण करण्यात येत आहेत. वर्ष २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी मागणी क्र. वाय-२, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प, (०६) (१६) प्रकल्प नियोजन व संनियंत्रण कक्ष (जलस्वराज्य योजना) (२२१५ ९३०७), ३१- सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली रुपये ९१ .०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.सदर कार्यक्रमासाठी असलेल्या अर्थसंकल्पीत तरतुदीपैकी रु.४५.५० कोटी इतकी तरतूद भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथील उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, (Dy.Secretary and Project Director, RSPMU) यांचे नावे असलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/C.) क्र.६१८४३५००१० मध्ये जमा करुन संबंधित

यंत्रणांना वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी मागणी क्र. वाय-२, २२१५ - पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ - ग्रामीण पाणी पुरवठा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प, (०६) (१६) प्रकल्प नियोजन व संनियंत्रण कक्ष (जलस्वराज्य योजना) (२२१५ ९३०७), ३१- सहाय्यक अनुदान या लेखाशिर्षाखाली वर्ष २०२१ - २२ साठी मंजूर असलेल्या अर्थसंकल्पित तरतुदीमधून रु. ४५.५० कोटी (अक्षरी रुपये पंचेचाळीस कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी जलस्वराज्य-२ कार्यक्रमाच्या बाबींवर खर्च करण्याकरिता उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांचे नावे भारतीय रिझर्व्ह बँक (Dy. Secretary and Project Director, RSPMU) येथे असलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र.६१८४३५००१० मध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम रुपये ४५.५० कोटी (अक्षरी रुपये पंचेचाळीस कोटी पन्नास लाख फक्त) वितरणाकरिता शासन निर्णय क्र. जस्वप्र-१०२०/प्र.क्र.७८/पापु-११, दि.०१.०२.२०२२ अन्वये अवर सचिव (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सु.स.प्र.व्य.कक्ष) यांचे नावे भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथील उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, (Dy. Secretary and Project Director, RSPMU) यांचे नावे असलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र.६१८४३५००१० मध्ये जमा करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांनी सदर अनुदानाची रक्कम “Dy.Secretary and Project Director (R.S.P.M.U) P.L.A. A/C ६१८४३५००१०” यांचे नावे, धनादेशाद्वारे उपलब्ध करुन दयावी.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५०/१४४३, दि.२९.१२.२०२१ आणि वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.०२ /व्यय-३, दिनांक १४.०१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०४१०३४४७३७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NIWRUTTI DHAS

Digitally signed by ANIL NIWRUTTI DHAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d4436034 26329c81b1b292ed2d168c892811118cc7, pseudonym=5FAC89C62F10057488AFEE82EA 1CEADC1D024102, serialNumber=F85F1C64C05886C8D514E40D 54D27FF3A80FFD907A05433B1C412B7F7FFA 0AFD, cn=ANIL NIWRUTTI DHAS
Date: 2022.02.04 15:26:07 +05'30'

(अनिल धस)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, फ्री प्रेस जनरल मार्ग, मुंबई-२१.
३. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा-कुर्ला संकुल (पूर्व), मुंबई-५१.
४. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
५. वित्त विभाग (व्यय-३/को.षा.प्र.५/असं-१८)
६. नियोजन विभाग (कार्या-१४४३/१४१४)
७. अवर सचिव (पापु-०४), लेखाधिकारी (पापु-२०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई.
८. आहरण व संवितरण अधिकारी, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई-४०० ६१४.
९. रोख शाखा, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई-४०० ६१४.
१०. निवड नस्ती, कार्यासन क्र.पापु-११, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवी मुंबई-४०० ६१४.